**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्र. पोप्रमा-१२१६/प्र.क्र.८१७/पोल-७.**
मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०१७.

**विषय** :- पोलीस ठाणे, जारावंडी, ता. एटापल्ली, जि. गडचिरोली, येथे प्रकार-२ ची आठ शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांचे पत्र क्र.८६७, दिनांक ०३.१२.२०१६.

**ज्ञापन-**

पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे पोलीस ठाणे, जारावंडी, ता. एटापल्ली, जि. गडचिरोली, येथे प्रकार-२ ची आठ शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, गडचिरोली, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.१,५३,११,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते रु. १८५.७५ लाख असे सुधारित केले आहेत. त्या अनुसार पोलीस ठाणे, जारावंडी, ता. एटापल्ली, जि. गडचिरोली, येथे प्रकार-२ ची आठ शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यासाठी **रु.१८५.७५ लाख** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

1) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
2) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
3) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

४. ही मान्यता, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अनुसार प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करत, प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१०, मुख्य लेखाशीर्ष, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००) (०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणासाठी (४०७० ०१५१) (योजनेअंतर्गत), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५६७/इमा-२, दिनांक ३१.१२.२०१६, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०३१७१२३५२५४१२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.17 12:36:45 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, गडचिरोली.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
६) निवड फाईल (पोल-७).